सन २०१३-१४ पर्यंतच्या अखर्चित अनुदानाच्या विनियोगास मान्यता देणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः PHD -३००११/६३७/२०१५/ आ-७

१०वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
मुंबई- ४००००१
तारीख: ०१ सप्टेंबर , २०१५

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः इएमएस २०११/ प्र.क्र.२२४/ आरोग्य ३ , दि. २८ मार्च, २०१२
२) शासन निर्णय क्रमांकः इएमएस २०११/ प्र.क्र.२२४/ आरोग्य ३ , दि.२८ मार्च, २०१३
३) शासन निर्णय क्रमांकः राग्राअ-२०१२/ प्र. क्र.२२७ / आ-७ , दि.३० मार्च, २०१३
४) शासन निर्णय क्रमांकः PHD ३००११/२१३(२)/ २०१३- PHD-Arogya-७, NRHM, दि.२९ मार्च, २०१४
५) शासन निर्णय क्रमांकः साआवि- ३००११/८७/२०१४- साआवि- आ-७, राग्राआअ, दि.०७ ऑक्टोबर, २०१४
६) शासन निर्णय क्रमांकः इएमएस २०११/ प्र.क्र.२२४/ आरोग्य ३ , दि. २२ ऑक्टोबर, २०१४
७) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, रा.आ.अ , मुंबई यांचे क्र. राआसोम / एफएमजी/ राहि/ ३४१०५-१०६ / २०१५-१६ द दि. २६ ऑगस्ट, २०१५ चे पत्र

**प्रस्तावना -**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत राज्य हिश्यापोटी दि. २८ मार्च, २०१२ च्या शासन निर्णयाद्वारे रू. २,०००.०० लाख, दि. ३० मार्च, २०१३ च्या शासन निर्णयान्वये रू.७,३००.०० लाख, दि. २९ मार्च, २०१४ च्या शासन निर्णयाद्वारे रू.७,१६१.६६ लाख आणि दि. ०७ ऑक्टोबर, २०१४ च्या शासन निर्णयान्वये रू. २,१३८.०० लाख इतके अनुदान राज्य आरोग्य सोसायटीकडे योजनेच्या अंमलबजावणीकरीता वर्ग करण्यात आले आहे. महाराष्ट्र आपत्कालीन वैद्यकीय सेवा ही योजना काही कारणास्तव विलंबाने म्हणजेच दि. २४ जानेवारी, २०१४ पासून प्रत्यक्षात कार्यान्वित करण्यात आली. सदर योजनेतील आवर्ती / अनावर्ती खर्चास दि. २२ ऑक्टोबर, २०१४ च्या शासन

शुद्धीपत्रकान्वये मान्यता देण्यात आली. यास्तव दरम्यानच्या काळात सर्व वितरीत अनुदानचा विनियोग त्या त्या वर्षी करणे राज्य आरोग्य सोसायटीला शक्य झाले नाही. त्यामुळे प्राप्त अनुदानापैकी रू. ७०१७.३० लाख खर्च होऊन रू. १८५९९. ०० लाख सन २०१३-१४ अखेर अखर्चित राहीले. सदर अखर्चित अनुदानाचा सन २०१३ -१४, सन २०१४-१५ व सन २०१५-१६ मधील आवर्ती व अनावर्ती खर्चासाठी विनियोग करण्याबाबत आयुक्त (कु.क.) तथा संचालक, रा. आ.अ यांनी सादर केलेल्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

राष्ट्रीय आरोग्य अभियानाच्या केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत महाराष्ट्र आपत्कालिन वैद्यकीय सेवा या कार्यक्रमाकरीता प्राप्त अनुदानापैकी सन २०१३-१४ अखेर प्राप्त रू. १८५९९.६६ लाख अनुदानाचा विनियोग पुढीलप्रमाणे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**रू. लाखात**

| | | |
|---|---|---|
| १. | सन २०१३-१४ पर्यंतचा आवर्ती/ अनावर्ती खर्च | ६९५४.९६ |
| २. | सन २०१३-१४ व २०१४-१५ मधील अनावर्ती ( Capex) खर्च | १२५३.०० |
| ३. | सन २०१४-१५ मधील आवर्ती ( Opex ) वरील खर्च | ८०७०.०० |
| ४. | सन २०१५-१६ मधील आवर्ती ( Opex ) वरील खर्च | २३२१.७० |
| | **एकूण** | **१८५९९.६६** |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०११४००४२६३१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: CN = Manohar Sadhu Thombare, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.09.01 15:06:05 +05'30'

**( मनोहर ठोंबरे)**
**महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव**

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सह संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे.
६. सहाय्यक संचालक (लेखा व लेखा परिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिाकरी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. नियोजन विभाग (का. १४७२), मंत्रालय, मुंबई.
९. वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१०.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
११.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती (आरोग्य ७)